**राज्य योजनेतंर्गत महाबळेश्वर येथील हिरडा वन विश्रामगृह नुतनीकरणासाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.वनबा-२०१५/प्र.क्र.२६७/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २९ सप्टेंबर, २०१५**

वाचा :- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.वनबा-२०१५/प्र.क्र. २६७/फ-९, दिनांक १९.८.२०१५

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.७३/(१५-१६)/११८२/१५-१६, दिनांक २४.९.२०१५

**प्रस्तावना :-**

राज्य योजना अंतर्गत महाबळेश्वर येथील हिरडा वनविश्रामगृह नुतनीकरणासाठी रु.७१,२७,३५०/- रकमेच्या अवस्था-१ च्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन दिनांक १९.८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) देण्यात आलेली आहे.

वार्षिक योजना सन २०१५-१६ राज्य योजनेअंतर्गत महाबळेश्वर येथील हिरडा वन विश्रामगृह नुतनीकरणासाठी अवस्था-१ करिता रू. ७१,२७,३५०/- रकमेचा नवीन बाब प्रस्ताव संदर्भ क्रमांक २ अन्वये प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने सदर विश्रामगृहाच्या नुतनीकरणाच्या बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वार्षिक योजना सन २०१५-१६ राज्य योजनेअंतर्गत महाबळेश्वर येथील हिरडा वन विश्रामगृह नुतनीकरणासाठी रू. ७१,२७,३५०/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर तरतूद प्रधान शिर्ष ४४०६ वनीकरण व वन्यजीवन या वरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना (०१) वनीकरण, ०७० दळणवळण व इमारती (००) (०२) वनातील इमारती बांधकाम (४४०६ ००२६), ५३-मोठी बांधकामे या लेखाशिर्षा खाली सन २०१५-१६ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून खर्च भागविण्यात यावा.
२. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षत घ्यावी.
३. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनिमय, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९३०११५२२५२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.09.30 11:57:11 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ फॉरेस्ट फोर्स), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर.
४. उपवनसंरक्षक, सातारा.
५. महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२(निवडनस्ती)